महाराष्ट्र राज्य उर्दू साहिज्य अकादमीकडून राबविण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी वार्षिक योजना सन २०१४-१५ ला प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः उसाअ २०१३/प्र.क्र.३५/उसाअ**

मादाम कामा रोड, हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ३१ ऑक्टोबर, २०१४

**वाचा**

१) पूरकपत्र, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक बियुडी-२०१४/प्र.क्र.४४(२)/का-७, दि.१०९.२०१४

२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक उसाअ २०१३/प्र.क्र.३५/उसाअ दि.२६.८.२०१४.

**प्रस्तावना**

महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीकडून राबविण्यात येणाऱ्या विविध प्रकल्प/ कार्यक्रमांच्या अंमलबजावणीसाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या पूरक अनुदानास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई या कार्यालयाला विविध प्रकल्प/ कार्यक्रमांच्या अंमलबजावणीसाठी सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षात रु. ७०.०० लाख (रुपये सत्तर लाख मात्र) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आलेली होती व तद्नंतर पुरवणी मागणीद्वारे रु.२०.०० लाख एवढे पूरक अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे. रु.७०.०० लाख इतक्या अर्थसंकल्पिय तरतुदीस वरील यापूर्वीच संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली असून पूरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रु.२०.०० लाख इतक्या पूरक अनुदानास याद्वारे पुढीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्यक्रम | रक्कम |
|---|---|---|
| १ | उर्दू वर्गासाठी सहायक अनुदान (रु.३०,०००/-x५) | रु.१,५०,०००/- |
| २ | चर्चासत्र, Syposium, कार्यशाळा, कॉन्फरन्स, मुशायरा,<br>अ) स्थानिक उर्दू मेहफिल, उर्दू सभा (२०,०००x५)= रु.१,००,०००/-<br>आ) जिल्हास्तरीय उर्दू मेहफिल, उर्दू सभा (३०,०००x५)= रु.१,५०,०००/-<br>इ) राज्यस्तरीय चर्चासत्र (५०,०००x४)= रु.२,००,०००/-<br>ई) राष्ट्रीय चर्चासत्र (१,००,०००x२)= रु.२,००,०००/- | रु.६,५०,०००/- |
| ३ | उर्दू शाळा, महाविद्यालये व विद्यापीठाना वाङ:मयीन कार्यक्रम आयोजनासाठी सहाय्यक अनुदान (१०,०००x१०) | १,००,०००/- |
| ४ | उर्दू ग्रथांलयांना मासिके, त्रैमासिके व पुस्तकरुपी अनुदान (शाळा/महाविद्यालयांना प्राधान्य) | ३,००,०००/- |
| ५ | उर्दू नाट्यमहोत्सव (रु.३,००,०००x१) | ३,००,०००/- |
| ६ | उर्दू हस्तलिखित प्रकाशन तसेच उर्दू मराठी व मराठी उर्दू अनुवादकांना प्रकाशनासाठी आर्थिक अनुदान | १,००,०००/- |
| ७ | आजारी अवस्थेतील प्रसिध्द उर्दू लेखक, कवी इत्यादींना मदत (रु.१०,०००x१०) | १,००,०००/- |
| ८ | कार्यालयीन खर्च = रु.५०,०००/-<br>कार्याध्यक्ष व इतर सदस्यांना प्रवास/दैनिक भत्ते खर्च = रु.१,००,०००/-<br>कार्याध्यक्षांना मानधन = रु.५०,०००/-<br>तात्पुरत्या स्वरुपात घेतलेल्या कर्मचारावृंदास वेतन = रु.१,००,०००/- | रु.३,००,०००/- |
| | | **रु.२०,००,०००/-** |

उपरोक्त रक्कम मागणी क्र.झेडई ०१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम ०१-अल्पसंख्यकांना सहाय्य, राज्य योजनांतर्गत योजना (०१)(२३) महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या विविध योजनांसाठी सहाय्यक अनुदान या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकरण्यात यावा व त्याखाली मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mdd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०३११५२३०७३११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2014.10.31 15:35:56 +05'30'

**( अनिस शेख )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यापालांचे सचिव,
२. कार्याध्यक्ष, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी (अकादमीच्या कार्यालयामार्फत)
३. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
५. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अवर सचिव (का.२, ४ व ७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११. कक्ष अधिकारी (का-४), अल्पसंख्याक विकास विभाग, मुंबई
१२. निवड नस्ती.